<u>जिल्हा परिषद स्तरावर मध्यवर्ती माहिती व तंत्रज्ञान कक्ष (IT Cell) स्थापन करणेबाबत.</u>

# महाराष्ट्र शासन
## ग्राम विकास विभाग
## शासन निर्णय क्रमांकः संग्राम-२०१४/प्र.क्र.१२७/संग्राम कक्ष

बांधकाम भवन, मर्झबान पथ, फोर्ट
मुंबई - ४०० ००१
तारीख: २० ऑगस्ट २०१४

## प्रस्तावना

राज्यातील विविध प्रशासकीय विभागाच्या अधिपत्याखालील कल्याणकारी विकास योजना हया जिल्हा परिषदेमार्फत राबविण्यात येतात. या योजनांची अंमलबजावणी व देखरेख जिल्हा परिषद, पंचायत समिती व ग्रामपंचायत स्तरावर होत असते. या योजनांसाठी प्राप्त निधी, भौतिक व आर्थिक प्रगती अहवाल संबंधित योजनांशी निगडीत आज्ञावलीत भरण्यात येतो. या योजनांसाठी असलेल्या प्रशासकीय खर्चातून तांत्रिक मनुष्यबळही उपलब्ध करून घेण्यात येते. असे तांत्रिक मनुष्यबळ जिल्हा परिषद / पंचायत समिती स्तरावरील संबंधित खातेप्रमुखांच्या अधिपत्याखाली उपलब्ध असते. या शिवाय ग्रामविकास विभागामार्फत राबविण्यात येणाऱ्या ई-पंचायत / संग्राम प्रकल्पाअंतर्गतही संबंधित पंचायती राज संस्थांना महाऑनलाईन या अंमलबजावणी यंत्रणेमार्फत कंत्राटी तांत्रिक मनुष्यबळ उपलब्ध करून देण्यात आलेले आहे. तसेच जिल्हा परिषद / पंचायत समिती यांच्या आस्थापनेवरही संगणक व तंत्रज्ञान वापराची तांत्रिक क्षमता असलेले कर्मचारी उपलब्ध आहेत. या वेगवेगळया योजनांखालील तांत्रिक मनुष्यबळ ठिकठिकाणी विखुरलेला असल्यामुळे त्याचा पुरेपर व परिणामकारक वापर शक्य होत नाही. या सर्व तांत्रिक मनुष्यबळाचा पूर्ण क्षमतेने वापर करून पंचायती राज संस्थांचे कामकाज लोकाभिमुख, पारदर्शक व कार्यक्षम करण्यासाठी, माहिती व तंत्रज्ञानाचा प्रभावी वापर करून जलद गतीने माहिती उपलब्ध करून घेणे, उपलब्ध माहितीच्या आधारे विकास कामांचे नियोजन व परिणामकारक अंमलबजावणी, देखरेख, माहितीचे विविध प्रशासकीय विभागांमध्ये आदान-प्रदान व विविध प्रणालींचा परिणामकारक वापर करण्यासाठी जिल्हा परिषद स्तरावर मध्यवर्ती माहिती व तंत्रज्ञान कक्ष निर्माण करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचारधीन होता.

## शासन निर्णय

प्रस्तावनेत नमूद केल्याप्रमाणे ई- गव्हर्नन्सच्या प्रभावी अंमलबजावणी करण्यासाठी जिल्हा परिषद स्तरावर मध्यवर्ती माहिती व तंत्रज्ञान कक्ष निर्माण करण्याचा निर्णय शासनाकडून घेण्यात आलेला आहे.

१) मध्यवर्ती माहिती व तंत्रज्ञान कक्षामध्ये विविध योजनांशी संलग्न आज्ञावलींमध्ये माहिती भरण्यासाठी तसेच देखरेख व अंमलबजावणीसाठी उपलब्ध करून देण्यात आलेल्या तांत्रिक मनुष्यबळाचा समावेश करण्यात यावा. यात संग्राम प्रकल्प तसेच विविध खातेप्रमुखांकडे त्यांचे देखरेखीखालील योजनांसाठी उपलब्ध करून देण्यात आलेल्या मनुष्यबळाचा समावेश करावा.

२) जिल्हा परिषद / पंचायत समिती आस्थापनेवर तांत्रिक क्षमता असलेल्या अधिकारी / कर्मचाऱ्यांना मध्यवर्ती माहिती तंत्रज्ञान कक्षाकडे वर्ग करता येईल. यासाठी आवश्यकता भासल्यास मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांना त्यांचे अंतर्गत असलेल्या जिल्हा परिषद / पंचायत समितीच्या अखत्यारीतील कार्यालयांकडून अशा कर्मचाऱ्यांची प्रतिनियुक्ती (Deputation) अथवा उसनवारी तत्वावर (Loan basis) नेमणूक करण्याची मुभा राहील.

३) संबंधित योजनेशी संलग्न अधिकारी / कर्मचारी त्यांचेकडून वर्ग करण्यात आलेल्या तांत्रिक मनुष्यबळाकडून माहिती भरून घेणे / अदययावत करणे व वरिष्ठांना आढाव्यासाठी उपलब्ध करून देण्यास जबाबदार राहतील.

४) मध्यवर्ती माहिती व तंत्रज्ञान कक्ष हा जिल्हा परिषदेच्या सामान्य प्रशासन विभागाशी संलग्न व उपमुख्य कार्यकारी अधिकारी (सामान्य प्रशासन विभाग) यांच्या अधिपत्याखाली असेल. संबंधित मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद हे संनियंत्रण अधिकारी असतील.

या मध्यवर्ती माहिती व तंत्रज्ञान कक्षाच्या कार्यकक्षा व कामे खाली नमूद केल्याप्रमाणे असतील:-

i. जिल्हयात जिल्हा परिषद, पंचायत समिती तसेच ग्रामपंचायतींच्या कार्यक्षेत्रात **e-Governance** शी निगडित बाबींना चालना देऊन गतीमान ठेवणे. जसे की, **Financial Inclusion, CSC-SPV** अंतर्गत देण्यात येणाऱ्या विविध सेवा इत्यादी सुरळीतपणे कार्यान्वित ठेवणे जेणेकरून नागरिकांना या सेवा विनासायास उपलब्ध होतील.

ii. जिल्हा परिषद, पंचायत समिती व ग्रामपंचायत स्तरावर केंद्र, राज्य, जिल्हा नियोजन व विकास समितीकडील योजना, जिल्हा परिषदेच्या स्वउत्पन्नातून राबविण्याच्या योजना, ई- टेंडरिंग, सेवार्थ, शालार्थ, ई- पंचायत इतर फ्लॅगशिप योजनांची माहिती आज्ञावलीत संबंधितांकडून भरुन घेणे.

iii. पंचायती राज संस्थांच्या कामकाजाच्या आढाव्यासाठी वेळोवेळी उपलब्ध करून देण्यात येणाऱ्या MIS Formats मध्ये माहिती भरून संबंधित अधिकाऱ्यांना उपलब्ध करून देणे.

iv. जिल्हा परिषद, पंचायत समिती व ग्रामपंचायतींअंतर्गत राबवावयाच्या योजनांच्या माहितीचे संकलन (डेटाबेस) करणे.

v. संकलित व प्रमाणित माहितीचे विविध खात्यांना / विभागांना आवश्यकतेनुसार आदान-प्रदान करणे.

vi. जिल्हा परिषद / पंचायत समित्यांचे संकेतस्थळ अदययावत ठेवणे.

vii. जिल्हा परिषद / पंचायत समिती Video Conference सुविधा, LAN जोडणी, बायोमॅट्रीक सुविधा / सी.सी.टी.व्ही. तसेच कॉम्प्युटर, प्रिंटर, युपीएस, वेब कॅमेरा इत्यादी सुविधा कार्यरत ठेवण्यासाठी निगडीत प्राथमिक स्वरूपाच्या तांत्रिक बाबींची देखरेख करणे.

viii. नागरिकांना दयावयाच्या विविध सेवा-सुविधांच्या संकेतस्थळांची प्राथमिक देखभाल तसेच सेवा सुविधा प्रदानांमधून प्राप्त होणाऱ्या शुल्काचे ग्रामपंचायत निहाय वितरण यावर देखरेख ठेवणे.

ix. उपरोक्त सर्व बाबींचा समन्वय साधण्यासाठी सामान्य प्रशासन विभागातील माहिती व तंत्रज्ञान कक्षाकडे वर्ग केलेल्या कक्ष अधिकारी अथवा तत्सम अधिकाऱ्याने या कक्षातील कंत्राटी तसेच खातेप्रमुखांकडून योजना निहाय वर्ग करण्यात आलेल्या कर्मचाऱ्यांना विषय वाटप करून दयावे.

x. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांनी नेमून दिलेली इतर कोणतीही कामे.

मध्यवर्ती माहिती व तंत्रज्ञान कक्षाच्या कामकाजाचा आढावा किमान दरमहा किंवा गरजेनुसार केव्हाही मुख्य कार्यकारी अधिकारी**,** जिल्हा परिषद यांच्या अध्यक्षतेखाली असलेल्या खालील नियंत्रण समितीने घ्यावा.

| | | |
|---|---|---|
| १. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद | - | अध्यक्ष |
| २. अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद | - | सदस्य |
| ३. प्रकल्प संचालक, जि. ग्रा. वि. यंत्रणा, जिल्हा परिषद | - | सदस्य |
| ४. उपमुख्य कार्यकारी अधिकारी (सा.प्र.वि.), जिल्हा परिषद | - | सदस्य सचिव |
| ५. मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद | - | सदस्य |
| ६. उपमुख्य कार्यकारी अधिकारी (ग्रामपंचायत), जिल्हा परिषद | - | सदस्य |
| ७. उपमुख्य कार्यकारी अधिकारी (म. व बा. क.), जिल्हा परिषद | - | सदस्य |
| ८. जिल्हा आरोग्य अधिकारी, जिल्हा परिषद | - | सदस्य |
| ९. संबंधित खाते प्रमुख | - | निमंत्रित सदस्य |
| १०.आय.टी. क्षेत्रातील तज्ञ आवश्यक असल्यास | - | निमंत्रित सदस्य |

माहिती व तंत्रज्ञान कक्षाचे बळकटीकरण करण्यासाठी अधिकचे तंत्रज्ञान सहाय्य उपलब्ध करून घेण्यासाठी मुख्य कार्यकारी अधिकारी**,** जिल्हा परिषद हे कंत्राटी स्वरूपात तंत्रज्ञान सल्लागार **(Consultant)** विहीत कार्यपध्दती अवलंबून नेमू शकतील. अशाप्रकारे मध्यवर्ती माहिती व तंत्रज्ञान

कक्षासाठी आवश्यक त्या विविध खर्चासाठीची तरतूद जिल्हा परिषदेमार्फत विविध विभागाच्या योजना राबविण्यासाठी उपलब्ध करून दिलेल्या प्रशासकीय खर्चातून / जिल्हा परिषदा स्वनिधीतून / जिल्हा परिषदेच्या विविध रकमांवरील प्राप्त होणाऱ्या व्याजाच्या रकमेतून करण्यात यावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०८२०१३१२१९८५२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Santokh Singh Sandhu

Digitally signed by Santokh Singh Sandhu
DN: CN = Santokh Singh Sandhu, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Rural Development Department
Reason: I am approving this document
Date: 2014.08.21 14:49:48 +05'30'

**(एस. एस. संधू)**
**प्रधानसचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. मा. राज्यपालांचे सचिव
२. मा.प्रधान सचिव, विधानमंडळ सचिवालय
३. मा.मुख्यमंत्री, यांचे प्रधान सचिव
४. मा.उपमुख्यमंत्री, यांचे प्रधान सचिव
५. शासनाचे मुख्य सचिव
६. शासनाचे सर्व अप्पर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव (सर्व प्रशासकीय विभाग)
७. सर्व विभागीय आयुक्त,
८. सर्व सहसचिव/उपसचिव (ग्रामविकास विभाग)
९. सर्व जिल्हाधिकारी
१०.सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी
११.सर्व जिल्हा परिषदांचे अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी
१२.सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य लेखा व वित्त अधिकारी
१३.सर्व जिल्हा परिषदांचे उपमुख्य कार्यकारी अधिकारी, (पंचायत/सा.प्र.वि)
१४.सर्व पंचायत समित्यांचे गट विकास अधिकारी
१५.मुख्य परिचालन अधिकारी, महाऑनलाईन
१६.मा.मंत्री (ग्रामविकास) यांचे खाजगी सचिव
१७.मा.राज्यमंत्री (ग्रामविकास) यांचे खाजगी सचिव
१८. स्वीय सहायक प्रधान सचिव (ग्रा.वि), मा. प्रधान सचिव (ग्रा.वि) यांचे अवलोकनार्थ
१९.निवड नस्ती, संग्राम कक्ष, ग्रामविकास व पंचायत राज विभाग